उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांच्या अधिकाराबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बदली-०४२४/प्र.क्र.११९/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ०९ एप्रिल, २०२५

**वाचा:-** महसूल व वन विभाग, शासन आदेश,क्र.आस्था-२०१४/प्र.क्र.२७७/ई-६, दि.२८.०६.२०१६

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम, २००५ मध्ये शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या बदल्यांबाबत तरतुदी विहीत करण्यात आल्या असून त्यातील नियम ६ मध्ये बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यांची तरतुद करण्यात आली आहे. सदर नियम ६ च्या दुसऱ्या परंतुकानुसार प्राप्त अधिकारान्वये भूमि अभिलेख विभागातील उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक आणि मध्यावधी / मुदतपूर्व बदल्यांचे अधिकार वाचा येथील शासन आदेशान्वये जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, पुणे यांना प्रत्यायोजित करण्यात आलेले आहेत. उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) (संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक आणि मध्यावधी / मुदतपूर्व बदल्यांचे अधिकार क्षेत्रीय कार्यालयास प्रत्यायोजित करण्यात आल्यामुळे सदर संवर्गाच्या सेवाविषयक व अन्य प्रशासकीय बाबींच्या नियंत्रणामध्ये शासनस्तरावर अडचणी निर्माण होत होत्या. यास्तव उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक आणि मध्यावधी / मुदतपूर्व बदल्यांचे अधिकार शासनाकडे पुर्ववत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे-

**शासन निर्णय :**

भूमि अभिलेख विभागातील उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक आणि मध्यावधी / मुदतपूर्व बदल्यांचे अधिकार जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख,पुणे यांना प्रत्यायोजित केलेला वाचा येथील शासन आदेश,क्र.आस्था-२०१४/प्र.क्र.२७७/ई-६, दि.२८.०६.२०१६ हा याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील नियम ६ मध्ये शासकीय अधिकारी यांच्या बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यांची तरतुद विहीत करण्यात आली आहे. उक्त नियमात विहीत केलेले सक्षम प्राधिकारी यानुसार उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक आणि मध्यावधी /

मुदतपूर्व बदल्यांसंदर्भात खालील तक्त्यात रकाना क्र.४ मध्ये नमुद केल्याप्रमाणे सक्षम प्राधिकारी राहतील-

| अ.क्र | शासकीय कर्मचाऱ्यांचा गट/संवर्ग | बदलीचे स्वरुप | बदली अधिनियमातील तरतुदीनुसार बदली करण्यासाठी सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) | एप्रिल-मे महिन्यात **नियतकालिक** बदली | विभागाच्या सचिवांशी विचार विनिमय करुन प्रभारी मंत्री |
| २ | उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) | नियम ४ (४) व नियम ४(५) नुसार **मध्यावधी व मुदतपूर्व** | मा.मुख्यमंत्री |

२. उप अधीक्षक भूमी अभिलेख (गट-ब राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक आणि मध्यावधी/मुदतपूर्व बदल्यांसंदर्भात निर्णय घेताना संवर्गाशी संबंधित महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम, २००५ आणि सामान्य प्रशासन विभाग, महसूल व वन विभाग यांच्याकडून याबाबत निर्गमित करण्यात आलेल्या सर्व अधिसूचना,शासन निर्णय, शासन परिपत्रके यातील तरतुदी व निर्गमित केलेल्या सूचना लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०४०९१५४२१९९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2025.04.09 15:43:07 +05'30'

**( अश्विनी यमगर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
३) मा.मंत्री (महसूल) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
४) वरीष्ठ स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे.
६) सर्व उप संचालक भूमि अभिलेख.
७) सर्व जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख.
८)सर्व उप अधीक्षक भूमि अभिलेख.
९) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.